२०१०१११९१८५०१५००१

प्रादेशिक योजना - अमरावती
मौजे लोणटेक, प्रगणे बडनेरा, तालुका अमरावती येथील सर्व्हे क्र. ३८ मधील ७.०१ हेक्टर क्षेत्र कृषी विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम २० (३) अन्वये फेरबदलाची सुचना..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. टिपीएस-२८१०/२२७/प्र.क्र.१२१/२०१०/नवि-३०.**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : १५ नोव्हेंबर, २०१०.**

**शासन निर्णय**:-सोबतची सूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(शिवाजी पाटणकर)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
२) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सदर सूचनेचे वर्तमानपत्रातील जाहीरातीचे देयक कृपया आपल्या कार्यालयामार्फत अदा करण्यात यावे.)
३) जिल्हाधिकारी, अमरावती.
४) उप सचिव (नगररचना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) उप संचालक नगररचना, अमरावती विभाग, अमरावती.

(त्यांना विनंती करण्यात येते की, प्रस्तुत सूचना शासनाच्या दि. १३ सप्टेंबर, २०१० रोजीच्या परिपत्रकातील निदेशानुसार व खालील सूचनांप्रमाणे जाहीरात म्हणून प्रसिद्ध करुन घेणेबाबत सत्वर कार्यवाही करावी.)

| | | | |
|---|---|---|---|
| १ | जाहीरात देणाऱ्या कार्यालयाचे नांव | - | नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ |
| २ | जाहीरात कोणत्या दिनांकापर्यंत द्यावयाची आहे. | - | तात्काळ |
| ३ | प्रसिद्धीचे स्वरुप | - | स्थानिक |
| ४ | कोणत्या जिल्ह्यात | - | अमरावती जिल्ह्यात |
| ५ | किती वृत्तपत्रात | - | एका मराठी व एका इंग्रजी वृत्तपत्रात |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | वृत्तपत्राचे नांव | - | सर्वाधिक खपाच्या वृत्तपत्रात |
| ७ | कितीवेळा | - | एकदा |
| ८ | जाहीरात खर्चाचे देयक कोणत्या अधिकाऱ्याकडे पाठवावयाचे त्याच्या कार्यालयाचे नांव व संपूर्ण पत्ता | - | संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे. |

६) सहायक संचालक, नगररचना, अमरावती शाखा, अमरावती.

(त्यांना विनंती करण्यात येते की, प्रस्तूत सूचनेच्या अनुषंगाने अधिप्रमाणित करण्यात यावयाच्या भाग नकाशाच्या पाच प्रती शासनास विहीत मार्गाने सादर करण्यात याव्यात.)

७) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, नागपूर.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची सूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात अमरावती विभाग, भाग - एक पुरवणीमध्ये प्रसिध्द करण्यात येवून त्याच्या प्रत्येकी १० प्रती या विभागास व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, उप संचालक नगररचना, अमरावती विभाग, अमरावती यांच्याकडे पाठवाव्यात.)

८) कक्ष अधिकारी, कार्यासन (नवि-२९) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची सूचना विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.)

९) निवडनस्ती-(नवि-३०)

****************

**प्रादेशिक योजना - अमरावती**

मौजे लोणटेक, प्रगणे बडनेरा, तालुका अमरावती येथील सर्व्हे क्र. ३८ मधील ७.०१ हेक्टर क्षेत्र कृषी विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम २० (३) अन्वये फेरबदलाची सुचना..

**सूचना**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**मंत्रालय, मुंबई-४०००३२**

**दिनांक - १५ नोव्हेंबर, २०१०**

*महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६*

**क्रमांक:-टिपीएस-२८१०/२२७/प्र.क्र.१२२/२०१०/नवि-३०:** ज्याअर्थी, अमरावती प्रादेशिक योजना (यापुढे "उक्त प्रादेशिक योजना" असे संबोधिले आहे) शासनाच्या नगर विकास विभागाने महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७) (यापुढे उक्त अधिनियम असे संबोधिले आहे) चे कलम १५(१) अन्वये अधिसूचना क्र. टिपीएस-२८८७/सीआर-१९६/नवि-१३, दि. २९ मे, १९९३ अन्वये मंजूर केली असून ती दि. १५ ऑगस्ट, १९९३ पासून अंमलात आलेली आहे. उक्त प्रादेशिक योजनेत, अमरावती शहराच्या परिसर नकाशास (यापुढे "उक्त परिसर नकाशा" असे संबोधिले आहे) जिल्हाधिकारी, अमरावती यांनी आदेश क्र. नझुल/कक्ष-२/अका/कावि-४८१/२००४, दि. २० मे, २००४ अन्वये मान्यता दिली आहे ;

आणि ज्याअर्थी उक्त प्रादेशिक योजनेच्या उक्त परिसर नकाशात मौजे लोणटेक, प्रगणे बडनेरा, तालुका अमरावती येथील सर्व्हे क्र. ३८ मधील ७.०१ हेक्टर क्षेत्र (यापुढे ज्यास "उक्त क्षेत्र" असे संबोधले आहे) कृषी विभागात समाविष्ट आहे ;

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम-२० पोटकलम-(२) मधील तरतुदीनुसार उक्त क्षेत्र कृषी विभागातून वगळून खालील अटींच्या अधिन राहून रहिवास विभागात समाविष्ट करणे आवश्यक असल्याचे शासनाचे मत झाले आहे (यापुढे ज्यास "उक्त फेरबदल" असे संबोधले आहे);

अट क्र. १ - फेरबदलाखालील जागेच्या अभिन्यासात, १०% अनिवार्य खुल्या जागेव्यतिरीक्त १०% अतिरीक्त क्षेत्र सेवासुविधांकरिता सोडणे बंधनकारक राहील.

अट क्र. २ - फेरबदलाखालील जागेतील पायाभूत सुविधा पुरविण्याची जबाबदारी जमीन मालकाची / विकासकाची राहील.

आता, त्याअर्थी उक्त अधिनियमाच्या कलम - २० पोटकलम (३) अन्वये शासन उक्त फेरबदल करण्याचा इरादा जाहिर करीत आहे व उक्त फेरबदलाच्या अनुषंगाने नागरिकांकडून हरकती व सूचना योग्य त्या कारणांसह, ही सूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांचे लिखीत स्वरुपात मागविण्यात येत आहेत. हरकती / सूचना उप संचालक नगररचना, अमरावती विभाग, अमरावती यांच्याकडे पाठविण्यात याव्यात. विहित मुदतीत सुचना/हरकती दाखल करणा-यांना सुनावणी देण्याकरिता व शासनास अहवाल सादर करण्याकरिता शासनातर्फे अधिकारी म्हणुन उप संचालक नगररचना, अमरावती विभाग, अमरावती यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

उक्त फेरबदल दर्शविणारा नकाशा नागरिकांच्या अवलोकनार्थ खालील कार्यालयात कार्यालयीन वेळेत उपलब्ध आहे.

१) जिल्हाधिकारी, अमरावती.
२) उप संचालक नगररचना, अमरावती विभाग, अमरावती.
३) सहायक संचालक नगररचना, अमरावती शाखा, अमरावती.

**टिपः-** सदर फेरबदलाची सुचना विभागाच्या www.urban.maharashtra.Gov.in या वेब साईटवर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे नावाने व आदेशानुसार,**

(शिवाजी पाटणकर)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**Regional Plan - Amaravati**

Notice under section 20 (3) of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966 regarding deletion of the land bearing Survey No 38 of Mauje Lontek, Pragane Badnera, Taluka Amaravati from Agricultural Zone and to include in Residential Zone...

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai 400 032**
**Dated: 15th November, 2010.**

## NOTICE

***The Maharashtra Regional & Town Planning Act. 1966***

**No.TPS-2810/227/CR-122/2010/UD-30:** Whereas the Regional Plan of Amaravati Region (hereinafter referred to as the "said Regional Plan") has been sanctioned vide Government Notification of Urban Development Department's under section 15(1) of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra XXXVII of 1966) (hereinafter referred to as "the said Act") vide Notification No. TPS-2887/CR-196/UD-13, dated 29th May, 1993 and came into force with effect from 15th August, 1993. And in the said Regional Plan, the Peripheral Plan of Amaravati City (hereinafter referred to as "the said Peripheral Plan") has been sanctioned by the Collector, Amaravati vide his Marathi Order No. नझुल/कक्ष-२/ अका/कावि-४८१/२००४, dated 20th May, 2004 ;
ü

And whereas, in the said Peripheral Plan in the said Regional Plan, the land bearing Survey No. 38 of Mouje Lontek, Pragane Badnera, Taluka Amaravati admeasuring 7.01 Ha. (hereinafter referred to as the "said Land") is included in Agricultural Zone ;

And whereas the Government of Maharashtra is of the opinion that the said Land should be deleted from Agricultural Zone and should be included in Residential Zone, as provided in sub section (2) of section 20 of the said Act (hereinafter referred to as the "said Modification") subject to conditions mentioned below -

Condition No. 1 - In the lay out of the land under modification, apart from 10% compulsory open space, 10% additional space should be kept for amenities.

Condition No. 2 - It is the responsibility of the land owner / developer to provide infrastructure amenities to the land under modification.

Now, therefore, as provided in sub section (3) of section 20 of the said Act Government of Maharashtra declares its intention to initiate the said Modification and invites objections and suggestions from the general public within 30 days from the date of publication of this notice in the Maharashtra Government Gazette. Suggestions / objections shall be addressed to the Deputy Director of Town Planning, Amaravati Division, Amaravati who is hereby appointed as the officer to hear the suggestions/objections received within stipulated period only and to submit report on it to Government;

The plans showing the said modification is kept open for inspection by the public during office hours on all working days at the following offices.

1) The Collector, Amaravati.
2) The Deputy Director of Town Planning, Amaravati Division, Amaravati.
3) The Assistant Director of Town Planning, Amaravati Branch, Amaravati.

**Note:-** This Notice is also published on Government web site at www.urban.maharashtra.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

(Shivaji Patankar)
**Under Secretary to Government**